**सामान्य प्रशासन विभाग (खुद्द) साठी लागणारे रिसायकलिंग टोनर पुरविण्याकरिता दिनांक ०१.०८.२०१८ ते दिनांक ३१.०७.२०१९ या कालावधीसाठी दर करार करणेबाबत..**
**मे. शुभम इन्फोटेक, सांताक्रूझ (पूर्व), मुंबई.**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन निर्णय क्र. संसाख-२०१८/प्र.क्र.८१/कार्यासन-२४,**
**हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,**
**मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.**
**दिनांकः- ०१ ऑगस्ट, २०१८**

**प्रस्तावनाः-**

सामान्य प्रशासन विभाग (खुद्द) ला सन २०१८-१९ या कालावधीत लागणा-या रिसायकलिंग टोनरचा पुरवठा करण्यासाठी पुरवठादाराची नियुक्ती करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यानुसार प्रचलित कार्यपद्धतीचा अवलंब करुन महाराष्ट्र शासनाच्या संकेतस्थळावरुन दिनांक २८.०६.२०१८ रोजी मोहोरबंद दरपत्रके मागविण्यात आली. प्राप्त दरपत्रके दिनांक १२.०७.२०१८ रोजी विभागीय खरेदी समितीच्या झालेल्या बैठकीत विचारात घेण्यात आली असता तांत्रिक तपासणीत पात्र ठरलेल्या ३ निविदाधारकांनी नमूद केलेले दर विचारात घेऊन पुरवठेदार नियुक्ती करण्याबाबत शासनाने पुढीलप्रमाणे निर्णय घेतेला आहे.

**शासन निर्णयः-**

विभागीय खरेदी समितीने केलेल्या शिफारशीनुसार पात्र ३ निविदाधारकांपैकी **मे. शुभम इन्फोटेक, सांताक्रूझ (पूर्व), मुंबई** या पुरवठेदाराचे दर न्यूनतम आढळून आले. मे. शुभम इन्फोटेक यांचेबरोबर या न्यूनतम दरापेक्षा कमी दर करण्याबद्दल वाटाघाटी करण्यात आल्या असता मे. शुभम इन्फोटेक यांनी निविदेत सादर केलेल्या दरामध्ये साधारणतः ५ % पर्यंत दर कमी करण्याची तयारी दर्शविली व सुधारीत दरपत्रक शासनास सादर केले. सबब, पुरवठेदार यांनी कमी केलेले दर विचारात घेऊन सामान्य प्रशासन विभाग (खुद्द) ला सन २०१८-१९ या कालावधीत लागणा-या रिसायकलिंग टोनरचा पुरवठा करण्यासाठी **मे. शुभम इन्फोटेक, सांताक्रूझ (पूर्व), मुंबई** यांची दिनांक ०१.०८.२०१८ ते दिनांक ३१.०७.२०१९ या कालावधीसाठी पुढील विवरणपत्रात नमूद केलेल्या दराने रिसायकलिंग टोनरचा पुरवठा करण्यासाठी पुरवठादार म्हणून नियुक्ती करण्यात येत आहे.

| अ.क्र. | प्रिंटर क्रमांक / टोनर क्रमांक | रिसायकलिंग टोनर (प्रती नग) दर | प्रचलित दराने वस्तू व सेवा कर (GST) | एकूण रक्कम रुपये |
|---|---|---|---|---|
| १ | एच पी १०१५/१२ A | ७८६ | १४१ | ९२७ |
| २ | एच पी १५०५/३६ A | ७८६ | १४१ | ९२७ |
| ३ | एच पी ११०८/८८ | ७८६ | १४१ | ९२७ |
| ४ | एच पी १६०६/७८ A | ७८६ | १४१ | ९२७ |
| ५ | सॅमसंग १६१०/११९ | ८८१ | १५९ | १०४० |
| ६ | सॅमसंग १६४०/१०८ | ८८१ | १५९ | १०४० |
| ७ | सॅमसंग २०१०/११९ | ८८१ | १५९ | १०४० |
| ८ | सॅमसंग २१५०/२१५० | ८८१ | १५९ | १०४० |
| ९ | सॅमसंग २२५०/२२५० | ८८१ | १५९ | १०४० |
| १० | सॅमसंग ३३१० | १०१४ | १८३ | ११९७ |
| ११ | सॅमसंग एमएल २१६१ | ८८१ | १५९ | १०४० |
| १२ | सॅमसंग एमएल १०४ | ८८१ | १५९ | १०४० |
| १३ | ब्रदर एमएफसी ८३७०/३२१७/३२९०/३२५० | १०१४ | १८३ | ११९७ |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| १४ | ब्रदर ड्रम एमएफसी ८३७०/३२१७/३२९०/३२५० | १०१४ | १८३ | ११९७ |
| १५ | ब्रदर टोनर २२५०/२२६०/२२५५/२२८० | १०१४ | १८३ | ११९७ |
| १६ | ब्रदर ड्रम २२५०/२२६०/२२५५/२२८० | १०१४ | १८३ | ११९७ |
| १७ | ब्रदर फॅक्स टोनर ७३६०/२२६० | १०१४ | १८३ | ११९७ |
| १८ | ब्रदर फॅक्स ड्रम ७३६०/२२६० | १०१४ | १८३ | ११९७ |
| १९ | ब्रदर टोनर २३६५ | १०१४ | १८३ | ११९७ |
| २० | ब्रदर विथ ड्रम २३६५ | १०१४ | १८३ | ११९७ |
| २१ | रिको टोनर ३५१० | १२८६ | २३१ | १५१७ |

२. सामान्य प्रशासन विभाग (खुद्द) ला रिसायकलिंग टोनरचा पुरवठा करण्यासाठी निविदा सूचनेतील सर्व अटी व शर्तीचे पालन करणे पुरवठेदारावर बंधनकारक राहील. पुरवठेदाराने तसा लेखी करारनामा रु.१००/- च्या स्टँप पेपरवर शासनाबरोबर करणे आवश्यक राहील.

३. विभागाच्या आवश्यकतेनुसार रिसायकलिंग टोनरची मागणी करण्यात येईल व मागणी केल्यानंतर रिसायकलिंग टोनरचा तात्काळ पुरवठा करावा लागेल. तसेच करारनाम्याचे पालन समाधानकारक न झाल्यास करारनामा केव्हाही कोणतेही कारण न देता संपुष्टात आणणेबाबतचा अंतिम निर्णय शासनाचा राहील.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०१८०८०२१०३४४७०२०७ असा आहे. हा शासन निर्णय डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Riyajuddin Ibrahim Shaikh

Digitally signed by Riyajuddin Ibrahim Shaikh
DN: c=IN, o=Government OF Maharashtra, ou=General Administration Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=9de484ddd07ce81c26ea75089ab61e9adbc861ad93292b3867b37f1385d73ef7, cn=Riyajuddin Ibrahim Shaikh
Date: 2018.08.02 10:40:44 +05'30'

**( रि. इ. शेख )**

**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत-**

१) महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई
२) महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र, मुंबई
३) मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य यांचे वरिष्ठ स्वीय सहायक
४) सामान्य प्रशासन विभागातील सर्व अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव
५) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
६) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
७) वित्त विभाग (वि.सु.) विनियम कार्यासन, मंत्रालय, मुंबई
८) मे. शुभम इन्फोटेक, सांताक्रूझ (पूर्व), मुंबई- ४०००५५
९) सह सचिव (आस्थापना), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई
१०) कार्यासन-२६/कार्यासन-१९/कार्यासन-२४
११) निवड नस्ती.